डॉ. बंदोरवाला, कुष्ठरोग रुग्णालय, कोंढवा, पुणे यांच्या ताब्यातील सर्व्हे नं ३८ व ३९ मधील ११.१ हेक्टर या क्षेत्राऐवजी १० हेक्टर मौज येवलेवाडी ता.हवेली जि.पुणे येथील जमीन राष्ट्रीय प्राकृतिक संस्था, पुणे या संस्थेस नियोजित रुग्णालय व निसर्गोपचार महाविद्यालयाला देण्यासाठी महसुल व वन विभागाकडे प्रत्यार्पित करण्याबाबत.

**महाराष्ट्र शासन**
**सार्वजनिक आरोग्य विभाग**
**शासन निर्णय क्रमांकः संकीर्ण २०१२ / प्रक्र-३६८/ आरोग्य ३(अ)**
गो.ते.रुग्णालय संकुल इमारत, १० वा मजला, ए विंग
मंत्रालय, एल.टी.मार्ग, मुंबई- ४०० ००१.
दिनांक: २९ मार्च,२०१७.

**वाचा:-**

१) शासन निर्णय सम क्रमांक दिनांक ०३ सप्टेंबर, २०१५.
२) शासन ज्ञापन क्रमांक- जमीन ३४१३ /अनौ-१६ / प्रक्रपु६१/ज-५ दिनांक ३.१०.२०१५ महसुल व वन विभाग.

**प्रस्तावना :-**

शासन निर्णय समक्रमांक दिनांक ३ सप्टेंबर २०१५ अन्वये डॉ. बंदोरवाला, कुष्ठरोग रुग्णालय, कोंढवा, पुणे यांच्या ताब्यातील सर्व्हे नं ३८ व ३९ मधील ११.०१ हेक्टर/आर जमीन राष्ट्रीय प्राकृतिक संस्था, पुणे या संस्थेस नियोजित रुग्णालय व निसर्गोपचार महाविद्यालयाला देण्यासाठी महसुल व वन विभागाकडे प्रत्यार्पित करण्यात आली होती. सदर जमीन प्रत्यार्पणाबाबत कुष्ठरोग्यानी त्यांच्या वहिवाटाची जमीन हस्तांतरणास विरोध दर्शविला होता . त्याअनुषंगाने प्रत्यार्पणावरील जमीनीऐवजी मौ.येवलेवाडी ता.हवेली येथील सर्व्हे नं. ८ (जुना सर्व्हे नं ३७ कोंढवा) मधील १० हेक्टर क्षेत्र राष्ट्रीय प्राकृतिक चिकीत्सा संस्था, पुणे यांना देण्याकरिता महसुल व वन विभागाकडे प्रत्यार्पित करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय:-**

सार्वजनिक आरोग्य विभागाच्या अखत्यारीतील डॉ.बंदोरवाला, कुष्ठरोग रुग्णालय, कोंढवा, पुणे यांना हस्तातरीत केलेली सर्व्हे नं ३८ मधील ७.१. हेक्टर क्षेत्र व सर्व्हे नं ३९ मधील ४ हेक्टर अशी एकुण ११.०१ हे/आर जमीन सार्वजनिक आरोग्य विभागास परत करुन त्याऐवजी मौ.येवलेवाडी ता.हवेली येथील सर्व्हे नं. ८ (जुना सर्व्हे नं ३७ कोंढवा) मधील १० हेक्टर क्षेत्र राष्ट्रीय प्राकृतिक चिकीत्सा संस्था, पुणे यांना नियोजित रुग्णालय व निसर्गोपचार महाविद्यालयासाठी हस्तांतरीत करण्यासाठी महसुल व वन विभाग (जिल्हाधिकारी,पुणे) यांचेकडे वर्ग करण्यास सार्वजनिक आरोग्य विभागाची मान्यता देण्यात येत आहे.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा सांकेतांक क्रमांक २०१७०३२७१२४३०९१५१७ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Arun V Kadam

Digitally signed by Arun V Kadam
DN: CN = Arun V Kadam, C = IN, S = Maharashtra, O = Government Of Maharashtra, OU = Public Health Department
Date: 2017.03.29 21:36:44 +05'30'

**(अ.वि.कदम)**
अवर सचिव, महाराष्ट्र शासन.

प्रत,

१. प्रधान सचिव, महसुल व वन विभाग, मंत्रालय, मुंबई
२. आयुक्त,आरोग्य सेवा तथा संचालक,राष्ट्रीय आरोग्य अभियान,मुंबई
३. विभागीय आयुक्त, पुणे
४. जिल्हाधिकारी, पुणे
५. संचालक, आरोग्य सेवा, मुंबई
६. उपसंचालक, आरोग्य सेवा, पुणे मंडळ, पुणे
७. संचालक, राष्ट्रीय प्राकृतिक संस्था, पुणे
८. जिल्हा शल्य चिकीत्सक, पुणे.
९. प्रशासक, डॉ.बंदोरवाला कुष्ठरोग रुग्णालय, कोढवा, पुणे
१०.महालेखापाल,महाराष्ट्र-१/२(लेखा परिक्षा/लेखा व अनुज्ञेयता),मुंबई.
११.निवडनस्ती (आरोग्य-३अ).